महाराष्ट्र राज्य लॉटरी
महाराष्ट्र गौरव या मासिक सोडतीची
बक्षिस रचना व कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१४ / प्रक्र ७८/ लॉटरी-२.**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.

तारीख : २५ ऑगस्ट,२०१४.

वाचा : १) मे. सेरेनिटी ऑनलाईन ट्रेड सोल्युशन्स प्रा.लि. मुंबई यांचे सोबत शासनाने केलेला दि.०३/९/२०१३ चा करार.
२) शासन निर्णय क्र. मरालॉ २०१३/ प्र.क्र.७०/लॉ -२, दि.१७/८/२०१३

**शासन निर्णय:**

**"महाराष्ट्र गौरव"** ही मासिक सोडत केंद्र शासनाचा लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केली आहे. शासनाने मे. सेरेनिटी ऑनलाईन ट्रेड सोल्युशन्स प्रा.लि. मुंबई यांची महाराष्ट्र गौरव या मासिक सोडतीची तिकीट विक्री करण्याकरिता (Marketing) करारान्वये ठोक एजंट (Bulk Agent) म्हणून नियुक्ती केलेली आहे. या सोडतींची सर्व तिकीटे प्रस्तुत करारातील तरतुदीनुसार त्यांना विक्री करण्यात येणार आहे. त्यांचेकडून ही तिकीटे विक्रीसाठी इतर विक्रेत्यांना उपलब्ध होतील. महाराष्ट्र गौरव (मासिक) सोडत या सोडतीच्या बक्षिस योजनेत बुधवार दि. १८/९/२०१३ पासून बदल करण्यात आला आहे.

२. या सोडतींच्या दिनांक ०५/११/२०१४ रोजी दिवाळी विशेष सोडत मे. सेरेनिटी ऑनलाईन ट्रेड सोल्युशन्स प्रा.लि. मुंबई यांनी प्रस्तावित केले आहे. त्यानुसार दिनांक ०५/११/२०१४ रोजी दिवाळी विशेष सोडत काढण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. मात्र त्यानंतरच्या सोडती संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयानुसार पुढे सुरू राहतील.

**३.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या **"महाराष्ट्र गौरव"** या मासिक सोडतीच्या तिकीटांचे मुल्य **रू. ५०/-** असून **रु. ५१ लाखाचे** पहिले (सामायिक) बक्षिस ठेवण्यात आले आहे. या सोडतीत एकूण **५** मालिका असून प्रत्येक मालिकेत ६०,००० याप्रमाणे एकूण **३ लाख** तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक १०००० ते ६९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत.

**४.** या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उप संचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. या सोडतीची तिकीट छपाई मे. रूची सिक्युरिटी प्रिंटर्स, प्रा. लि., भोपाळ यांचेकडून करून घेण्यात येतील. या तिकीटाचे आकारमान २४ x १३ cms असून यासाठी १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन त्याचा दर प्रती एक लाख तिकीटाकरिता रू. ४६,३०९/- असा राहील.

**५.** घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

६. या सोडतींची बक्षिसरचना व बक्षिसे निश्चित करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र गौरव ( मासिक ) सोडत**

मालिका : ५
तिकीटांचे क्रमांक १०००० ते ६९९९९
सोडत दिनांक: ०५/११/२०१४
वेळ: सायं.४.०० वा.

एकूण तिकिटे : प्रत्येक मालिकेत ६०,०००
एकूण तिकिटे : ३ लाख
तिकीटाची किंमत : रू.५०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रू. | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां-तील बक्षिसांची एकूण रक्कम रु. |
|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | ५१,००,००० | -- | १ | ५१,००,००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ४ मालिकांसाठी १ बक्षिसाचा क्रमांक) | ५०,००० | १ | ४ | २,००,००० |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक)प्रत्येक मालिकेत | १,००,००० | १ | ५ | ५,००,००० |
| तिसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक)प्रत्येक मालिकेत | १०,००० | १ | ५ | ५०,००० |
| चौथे बक्षिस (शेवटचे ४ अंक) प्रत्येक मालिकेत | ५,००० | ६ | ३० | १,५०,००० |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) प्रत्येक मालिकेत | ३,००० | ६ | ३० | ९०,००० |
| सहावे बक्षिस(शेवटचे ४ अंक) प्रत्येक मालिकेत | २,००० | ६ | ३० | ६०,००० |
| सातवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) प्रत्येक मालिकेत | १००० | ६ | ३० | ३०,००० |
| आठवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | २०० | -- | ३०० | ६०,००० |
| नववे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास ) | ५० | -- | ३०,००० | १५,००,००० |
| **एकूण** | -- | | **३०,४३५** | **७७,४०,०००** |

**७. सोडतीची कार्यपध्दती :-**

या सोडतीचे बक्षिस विजेते क्रमांक निश्चित करण्यासाठी सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम्स ठेवले जातील. पहिल्या ड्रममध्ये ५ मालिकांचे अद्याक्षरे व क्रमांक असतील. प्रत्येक मालिकेमध्ये १०००० ते ६९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. दुस-या ड्रममध्ये १ ते ६ अंकाची प्रत्येकी एक चकती ठेवण्यात येईल. उर्वरीत ४ ड्रममध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती ठेवण्यात येईल. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/ रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे

चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील व तो क्रमांक विजेता म्हणून घोषित केला जाईल.

७.१ **दुसरे बक्षिस रू. १,००,०००/-** दुसरे बक्षिस रू. १,००,०००/- करिता पूर्ण अंकाचा एक भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. अशा पूर्ण अंकाच्या क्रमांकाला त्या त्या मालिकेतील तिकीटास रू.१,००,०००/- चे दुसरे बक्षिस देण्यात येईल.

**७.२ तिसरे बक्षिस रू. १०,०००/-** तिस-या रु. १०,०००/- करिता पूर्ण अंकाचा एक भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. अशा पूर्ण अंकाच्या क्रमांकाला त्या त्या मालिकेतील तिकीटास रू.१०,०००/- चे तिसरे बक्षिस देण्यात येईल.

**७.३ चौथे बक्षिस रू. ५,०००/-** चौथ्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**७.४ पाचवे बक्षिस रू. ३,०००/-** पाचव्या रु. ३०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ३०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**७.५ सहावे बक्षिस रू. २,०००/-** सहाव्या रु. २०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**७.६ सातवे बक्षिस रू. १,०००/-** सातव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १०००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**७.७ आठवे बक्षिस रू. २००/-** आठव्या रु. २००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाची एक जुळवणी या प्रमाणे १० जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**७.८ नववे बक्षिस रू. ५०/-** नवव्या रु. ५०/- च्या बक्षिसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० व्या क्रमांकास रू. ५०/- चे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

**७.९ पहिले (सामायिक) बक्षिस रू.५१,००,०००/-**

या मासिक सोडतीमध्ये पाच मालिकात मिळून **रूपये ५१ लाखाचे एक (सामायिक) पहिले बक्षिस** ठेवण्यात आलेले असून त्यासाठी प्रथमत: पाच मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी (पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील **परिच्छेद ७** मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

८. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

९ पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वासनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**१०.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**११.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

**१२.** वर नमूद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१३.** सदरच्या सोडतीची कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२३१४४९०२४९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJPUT AJITSINGH RAMSINGH

Digitally signed by RAJPUT AJITSINGH RAMSINGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SMALL SAVING AND LOTTERIES,CID - 918078, postalCode=400032, st=Maharashtra, cn=RAJPUT AJITSINGH RAMSINGH
Date: 2014.09.23 15:00:15 +05'30'

**(अ. रा. राजपुत )**
कार्यासन अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी, वित्त विभाग.

प्रति,

१.मा. उपमुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२.मा. मंत्री , गृह, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३.मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५.प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
७.पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.
८.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. सह सचिव (राज्य लॉटरी), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४.उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व), मुंबई १५.
१५.कक्ष अधिकारी, प्रशा-४,/लॉटरी-३/लेखाधिकारी, अर्थसं (लॉटरी संचालनालय) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.